# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

**शासन आदेश क्रमांकः एलटीएस-१२२३/(प्र.क्र.४४/२०२३)/आ (वर्ग-१)**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक : २८ जून, २०२३.

शासन आदेश :

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४(४), ४(५) व कलम ५ मधील तरतुदीनुसार आणि सक्षम प्राधिकरणाच्या मान्यतेने जलसंपदा विभागातील अधीक्षक अभियंता (यांत्रिकी) संवर्गातील खालील अधिकाऱ्यांच्या प्रशासकीय कारणास्तव बदलीने पदस्थापना स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे करण्यात येत आहेत:

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | सध्या धारण करीत असलेले पद | बदलीने पदस्थापनेचे पद | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री .विलास एकनाथराव गायकवाड | अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, कोल्हापूर | सध्याच्या पदावर सेवानिवृत्ती पर्यंत मुदतवाढ | बदली अधिनियमातील कलम ५ नुसार. |
| २. | श्री. जितेंद्र मधुकर गंटावार | अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, नागपूर | अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, नांदेड | बदली अधिनियमातील कलम ४(४) आणि ४(५) नुसार. |
| ३. | श्री. रविंद्र निळकंठराव वानखेडे | अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, नांदेड | अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ, नागपूर | बदली अधिनियमातील कलम ४(४) आणि ४(५) नुसार. |
| ४. | श्री .राजेंद्र हरी चव्हाण | सध्या महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नागपूर येथे प्रतिनियुक्तीवर | श्री.पुंडलिक मै. थोटवे यांच्या दि.३१.०७.२०२३ रोजीच्या सेवानिवृत्तिने रिक्त होणा-या अधीक्षक अभियंता (यां), सार्वजनिक बांधकाम विभाग, कोकण भवन, नवी मुंबई या पदावर | बदली अधिनियमातील कलम ४(४) आणि ४(५) नुसार. |

२. संबंधित अधिकाऱ्यास बदलीने पदस्थापनेच्या जागी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते बदलीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास **doesttclass1.wrd@maharashtra.gov.in**या ई-मेल संकेतस्थळावर त्वरित कळवावे.

३. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास, ते संबंधीत अधिकाऱ्यास मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्याचे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जाची दखल घेण्यात येणार नाही.

४. सदर बदली आदेशानुसार तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२३०६२८२०२१०२५१२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे. तसेच सदर शासन आदेश जलसंपदा विभागाच्या https://wrd.maharashtra.gov.in या संकेतस्थळावरही उपलब्ध करण्यात आलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

UDDHAV R DAHIPHALE

Digitally signed by UDDHAV R DAHIPHALE

**(उ. र. दहिफळे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. उप मुख्यमंत्री (जलसंपदा) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अ.मु.स.(जलसंपदा)/ सचिव ( लाक्षेवि) / सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. महासंचालक/सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
५. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
६. मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक.
७. सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
८. सर्व अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग.
९. संबंधित अधिकारी.
१०. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
११. कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.